# लोकल गोष्टी

## प्रवास

वयाची पंचविशी गाठली की मोठं झाल्याच जाणवायला लागतं.. जबाबदाऱ्या स्वीकारायची पूर्ण करण्याची सवय होत जाते.. कधीतरी पाहिलेली स्वप्ने वास्तवात उतरवाविशी वाटू लागतात.. त्याच वेळेला काळ त्याच्या वेगाने धावतच असतो.. दिवसांमागून दिवस जात जात तिशी ओलांडली जाते.. काही गोष्टी पूर्ण करण्यात यश आलेलं असतं काही मागेच सुटल्यासारख्या वाटतात.. तर काही अजूनही रात्रीचा दिवस करायला भाग पाडत राहतात.. त्याच बरोबर आणखीन एक विचार मनाला छळत राहतो की या इतक्या वर्षात आपण काय केलं ..? साठ सेकंदांचं मिनिट.. साठ मिनिटांचा तास.. चोवीस तासांचा दिवस.. तीनशे पासष्ट दिवसांच वर्ष.. आणि अशा तीनशे पासष्ट दिवसांची तीस वर्ष ..! आपण कशी आणि कुठे घालवली ..? गेलेलं एक एक मिनिट हिशोब मागायला लागतं. आपण अगदी सामान्य आहोत..!! (आलो तसेच एक दिवस जाणार ) असं आपलंच मन हिणवायला लागतं.

या दरम्यान घडलेले छोटे-मोठे प्रसंग डोळ्यासमोरून सरकत राहिले.. **माझ्या या आयुष्यातही बरंच काही होतंच. काही फक्त माझे तर काही सहज वाटता येण्यासारखे हजारो , लाखो प्रसंग.. त्याच वेळी आणखीन एक वाक्य मनात रुंजी घालू लागलं, " प्रत्येक जण आयुष्यात निदान एकतरी पुस्तक लिहू शकतोच.. ज्याचं त्याचं आपलं स्वतःचं पुस्तक ..! "** लिहिण्याची ऊर्मी दिवस रात्र वेढून असताना फर्जानाच्या निमित्तानं त्यातले काही विस्कळीत क्षण एका मागोमाग एक जोडले जाऊन कागदावर धावायला लागले. जणू त्यांना हेच सांगायचं होतं की, **" प्रवास मग तो जगभराचा असो की जिथल्या तिथे गरगरणारा असो .. कुणा जग जेत्याचा किंवा सर्व सामान्य व्यक्तीचा.. त्यातला क्षण अन क्षण अनुभवांनी संपन्न असतो”**

**स्वाती फडणीस**



# लोकल गोष्टी

यंत्रवत होत चाललेल्या रोजच्या धकाधकीच्या जीवनात.
माणुसकीचा ओलावा जपणाऱ्या प्रत्येक मुंबईकरास समर्पित..!



## स्टेशन्स

# नटवर

त्याला जगातल्या प्रत्येक गोष्टीत स्वारस्य होते... खिडकीतून दिसणाऱ्या आकाशाच्या तुकड्यात, रुळां पलीकडे वसलेल्या झोपड्यांमध्ये, मागे मागे पळत जाणाऱ्या झाडाझुडपात, डब्यात पसरलेल्या कचऱ्यात तस्साच या चमकत्या अंगठ्या कर्णफुलात. त्याला प्रत्येक वस्तू प्रत्येक गोष्ट बघायची होती, पारखायची होती...




स्टेशन मॅप

## नटवर

मधला २ क्लासच्या डबा तुमच्या पैकी बऱ्याच जणांना परिचित असेल.सेकंड क्लास आणि तो ही लेडीज सेकंड क्लास म्हणजे... गडबड- गोंधळ , भांडण बाचाबाची , साड्या-डागांची चौकशी व घर , नवरा, मुलं यांच्याशी जोडलेली गाऱ्हाणी. त्यात मधून फिरणारे फेरी वाले आणि गोंधळामुळे बावचळून गेलेल्या लहान मुलांची चिरचिर , या सगळ्याला छेदणारी एक हास्याची लकेर हे त्याचं वरवर दिसणारं रूप , पण या वातावरणात आपला प्रवेश झाला की मग आपल्याला त्यांतील आणखीनं बारकावे कळू लागतात. त्यांच्या भाव-मुद्रा पाहताना सगळ्या गर्दी गोंगाटाचा विसर पडतो, निदान मला तरी!.

ट्रेन मध्ये शिरल्यावर एक दोन मिनिटांतच माझी भूमिका सुरू होते. मी त्या चालत्या बोलत्या रंगमंच्याचा अविभाज्य घटक बनून जाते.

भूमिका रंगमंच हे जरा वेगळं वाटतंय ना ? पण तुम्ही ते माझ्या भूमिकेतून पाहिलंत तर मग तुम्हाला तसं वाटणार नाही. कारण ट्रेन मध्ये माझी भूमिका बऱ्याचदा प्रेक्षकाचीच असते.



हे लिहीत असताना कितीतरी चेहरे माझ्या नजरे समोरून सरकून जात आहेत. त्यांचे हावभाव अगदी आत्ता घडत असल्यासारखे मला स्पष्टपणे दिसताहेत..... मी नुकताच पाहिलेला एक एकपात्री प्रयोग... तो महान अभिनेता विसरणे अगदी अशक्य!

तो एक पाच-सहा वर्षांचा लहान मुलगा असेल... सैलसर शर्ट, त्याच्या खाली कळपट मळकी पँट , मोठ्ठे-मोठ्ठे डोळे, धार-दार नाक, नितळ मुलायम गाल, डोक्यावर तेलानं चापून चप्प बसवलेले केस..... एकूण चेहरा बऱ्यापैकी रेखीव होता... काय नाव असेल बरं त्याच?... अं अं...?

phadnissvp@gmail.com

हा!! आपण त्याला नटवर म्हणूया. त्याला इतर कोणतं नाव छे..!! शक्यच नाही.
आता कसं..? तो मुलगा करून बोलण्या पेक्षा नटवर म्हणायला जरा बरं वाटत नाही!!!

तर हा नटवर त्याच्या वया पेक्षा जरा जास्तच धीट ; मी ट्रेन मध्येचढल्या नंतर पुढच्याच स्टेशन वर तो चढला. माझ्या समोरच्या सिटवर एक प्रौढ बाई खिडकी शेजारी बसल्या होत्या तो सरळ त्यांच्या जवळ गेला आणि म्हणाला "आंटी मुझे खिडकी में बैठना है , थोडा खिसक के बैठो" त्याच्या बोलण्यात जरा सुद्धा भीती किंवा बुजरेपणा नव्हता , त्या बाईंना देखील अशीच नातवंड असवीतं! त्यांनी लगेच नटवरला खिडकीतली जागा देऊ केली, तसं ही... लोकल ट्रेनच्या खिडकीतून बाहेर पाहण्यासारखं असतच काय ? हां! थोडा वारा मिळतो, कोण कोणत्या वासांच्या भपकाऱ्या बरोबर येणारी हवा... नटवरला मात्र खिडकी हवी होती. त्या बाई त्यांना आपण सुमन काकी म्हणू... सुमन काकी जरा बाजूला होताच नटवर लगेच खिडकी शेजारी बसून बाहेर डोकावू लागला.

खरं तर... इथं पासून त्याच्या भूमिकेची सुरुवात झाली. तो अभिनय मी अगदी पहिल्या रांगेत बसून पाहतं होते. डब्यात नेहमी प्रमाणे काही फेरीवाले फिरत होते. त्यातली एक फेरीवाली तिच्या टोपलीत चिक्की राजगिऱ्याच्या वड्या, वेगवेगळ्या आकारांचे फ्रायम्स, वेफर्स, चिवडे वगैरे वगैरे खाऊ घेऊन आली. नटवर बराच वेळ तिच्या कडे बघून चुळबूळ करत होता. ती फेरी वाली आमच्या सिट जवळ आली तसे त्याने जोरात आपल्या आईला हाक मारली... "मम्मी " हाक मारताना त्याच्या चेहऱ्यावर एखादी अद्भुत! नावीन्यपूर्ण!! गोष्ट पाहिल्या सारखे भाव होते.. मग क्षण भर तो अगदी स्तब्ध उभा राहिला..... काहीच हालचाल नकरता स्तब्ध..!

एकदम कोरा करकरीत चेहरा, ना आशा.. ना निराशा.. ना चिक्की वेफर्ससाठीची इच्छा..!

(निर्विकार, निरिच्छ.. काहीसा विरक्त) त्या लगोलग घोर निराशा झाल्याचे भाव त्याच्या चेहऱ्यावर पसरत गेले. तेव्हाचा अधिक अधिकच खचत जाणारा नटवरचा चेहरा म्हणजे... जणू केविलवाणेपणाची परिसीमा!! तो इतका दीन बनला... की काय विचारता. तोंडाने कळवळल्यासारखे विभ्रम करीत तो त्याच्या अर्धवट उघडलेल्या हातांनी याचना करू लागला... आता तो भिकाऱ्याच्या भूमिकेत शिरला होता.

हा होता नटवर आणि त्याची मम्मी, यांच्या मधला दूरून झालेला साभिनय शब्दहीन संवाद... त्याला आजू बाजूच्या बघ्यांशी काही देणे-घेणे नव्हते... किंवा असे म्हणू का?... की त्याच्यासाठी त्याच्या अवती भवती कोणी नव्हतेच!!

phadnissvp@gmail.com

फक्त तो आणि त्याची मम्मी...दोघेच स्टेजवर... बाकी सगळे अंधारात दिसतील न दिसतील असे बसलेले प्रेक्षक. त्यांनी फक्त बघत राहाव थक्क होवून.. फार फार तर टाळ्या वाजवाव्यात.

नटवर भिकाऱ्याच्या भूमिकेत इतका समरस झाला होता की त्याला आधी न पाहिलेला कोणी ही त्याच्या हातावर पैसे टेकवल्या शिवाय पुढे गेलाच नसता इतकं दैन्य अशी याचना आणि भोळा भाबडा चेहरा...त्याला त्या अवस्थेत बघून मी ही बुचकळ्यांत पडले! मगाशी पाहिलेला तो ह्राच मुलगा की भिकारी, का तो मगाशी धिटाईने इथे येऊन बसलेला भिकारीच होता ? तेव्हढ्यात त्याच्या मम्मीचा आवाज ऐकू आला.... "आभी चूप बैठं, नही तो एक झापड लगाऊँगी " तो भिकारी नव्हता, तो भीक मागण्यासाठी डब्यात चढला नव्हता तो ही आमच्या सारखाच एक प्रवासी होता.

त्याच्या मम्मीच्या आवाजासरशी त्याने आपला भिकाऱ्याचा अवतार तिथेच आटोपता घेतला. आता पुढे!! दुसरा अवतार...

हा मुलगा शांत राहणारा नाही! हे आतापर्यंत आम्हाला जाणवले होते. आणि अजून तरी तो शांतच बसला होता. तसं मगाशी खाऊ साठी अगदी भिकाऱ्याच्या भूमिकेतही शिरणारा नटवर भलताच हट्टी ही वाटला होता. पण त्याने हट्ट तरी कुठे धरला...? ( एखादी गोष्ट आवडली. हवीशी वाटली, तशी इच्छा त्यानं मांडून पाहीली, इच्छा व्यक्त केल्या नंतर ती पुर्ण होणार नाही कळल्यावर त्या पासून दूर जायचा केलेला कडवा प्रयास, त्या तून आलेल्या विफलतेचं प्रदर्शन.. किंवा मनातल्या संघर्षाचा दृष्य आविषकार.. बस्सं आणखीन एक प्रयोग. ) तरी तो आता काय करेल याची धास्ती आम्हाला लागून राहिली होती मी तर त्याच्या अगदी समोर बसलेले, नाही म्हटलं तरी नजर त्याकडे वळतच होती. आणि मला जाणवलं अरे हा तर आमच्या सिटखाली काहीतरी बघतोय. त्याच्या चेहऱ्यावर कुतूहल ओसंडून जात होते.... आणि "माझ्या चेहऱ्यावर भीती " आता त्याचे टार्गेट माझ्या खाली!!

नटवर मान वळवून वळवून माझ्या सिट खाली पाहतं होता... त्याला तिथे काहीतरी खास दिसत होते नक्कीं!! मी माझ्या पायांकडे बघून घेतले , जरा पायांच्या अवती भावती नजर फिरवली पण छे!.. मला तिथे काहीच वेगळे दिसेना, कागदाचे चिटोरे, काही शेंगांची टरफले, पतऱ्यावरचे मळकट डाग एकूण सगळे काही नेहमीचेच त्यात इतके टक लावून बघण्यासारखे काय असावे?....

नटवर आता अगदी एकाग्र झाला होता. एखाद्या तिरंदाजाने शिकारीच वेध घ्यावा तसा... किंवा अगदी अर्जुना सारखा...

अर्जुनाला जसा पक्षाचा डोळा दिसत होता तसं आता नटवरला माझ्या सिटखाली काहीतरी दिसत होत. तेव्हाची नटवरची तल्लीनता अगदी पाहण्या सारखी होती जणू तो नजरेनेच ती वस्तू ओढून घेत होता.... तेव्हढ्यात आणखीन एका फेरीवालीची रंगमंचावर एंट्री झाली, आणि तिच्या मुळे नटवरची तंद्री भंग पावली. नटवर आता तिच्या दिशेने पाहतं होता त्याला दुसरे टार्गेट मिळाले होते.

मनातल्या मनात मी नटवरने दिला असता तस्सा सुटकेचा सुस्कारा सोडला.... आता आलेली ही फेरीवाली जवाहर खाना घेऊन आली होती. ( खरंतर नटवरला त्यात काय रस असावा ? नाही.) त्याला त्यात ही स्वारस्य होते त्याला जगातल्या प्रत्येक गोष्टीत स्वारस्य होते... खिडकीतून दिसणाऱ्या आकाशाच्या तुकड्यात, रुळां पलीकडे वसलेल्या झोपड्यांमध्ये , मागे मागे पळत जाणाऱ्या झाडाझुडपात , डब्यात पसरलेल्या कचऱ्यात तस्साच या चमकत्या अंगठ्या कर्णफुलात. त्याला प्रत्येक वस्तू प्रत्येक गोष्ट बघायची होती, पारखायची होती...

माझ्या शेजारी बसलेली एक चिमुरडी या विक्रेतीकडच्या रिंगा बघू लागली , समोरची सुंदरी ही तिला येऊन मिळाली, दोघी जणी मिळून अंगठ्यांच्या बॉक्स मध्ये उचक-पचक करत होत्या... चिमुरडीला एक रिंग आवडली "ये अंगुठी कैसे दी ? " चिमुरडीने विचारले. "हर अंगुठी का पाच रुपैया.. एक ही भाव " हा संवाद होई पर्यंत नटवर तिथे पोहचला होता. सोनेरी , चंदेरी, ऑक्सिडाईझ खड्यांच्या बीन खड्यांच्या अंगठ्यांची बरीच मोठी रेंज त्या बॉक्स मध्ये होती. नटवर त्यातली एक एक अंगठी उचलून एखाद्या कुशल पारख्याप्रमाणे निरखू लागला... या वेळी तो पारखीच नाही तर त्या मुलींसाठी सल्लागार बनला होता , चिमुरडी किंवा सुंदरीने एखादी अंगठी

उचलली रे उचलली की याची प्रतिक्रिया बघावी. काय काय तोंड करून तो आपली पसंती नापसंती त्या दोघींपर्यंत पोहचवत होता. जणू त्या दोघी याच्या सल्ल्यानेच खरेदी करणार होत्या.

सुंदरीला अखेर एक अंगठी पसंत पडली. ऑक्सीडाईझ रिंगवर बारीक उभारदार डिझाइन होते , नटवरला काही ती अंगठी आवडली नाही त्याने नाक मुरडून त्याची नापसंती झटक्यात दर्शवली पण सुंदरीची निवड करून झाली होती... आता पुढचे काम बार्गेनिंगच ते ही तेवढेच महत्त्वाचे नाही का! बार्गेनिंग केल्या शिवाय वस्तू खरेदी करण्यात कसली आली आहे मजा ? आणि ते ही असे ट्रेन मध्ये. बॉक्सभर अंगठ्या , कानातल्यांमधून एखादी वस्तू निवडून ती सांगितल्याच्या निम्म्या किमतीत मिळवली आणि मग

phadnissvp@gmail.com

मैत्रिणींच्यात बोलली-घेतली किंमत सांगत मिरवल्याशिवाय. बायका मुलींची हौस पुरी कशी होणार..! आता हे नटवरला कसं कळणार? ( शेवटी तो मुलगाच ना. )

अंगठी निवडून झाल्यावर नटवरला त्यात काही उत्सुकता उरली नाही. सुंदरीने त्याचे मार्ग दर्शन न घेतल्यामुळे तो बराच अस्वस्थ झाला आणि त्या दोन नाठाळ मुलींना सोडून काहीतरी पुटपुटत तो आपल्या खिडकीतल्या जागेवर जाऊन बसला. तिकडे नटवरचा अभिनय आणि इकडे बार्गेनिंग रंगत होतं.

नटवरचा मोर्चा परत आमच्या सिट कडे वळला... मगाशी तो काही तरी ओढत होता आता ती वस्तू त्याला ओढून घेत होती.... कोणी ओढावे आणि आपण प्रतिकार करावा अस काही तरी तो करू लागला. हळू-हळू त्याचा प्रतीकार क्षीण पडू लागला आणि तो सिटखाली ओढला जाऊ लागला , त्याला काही तरी जबरदस्तीने खेचून नेत होते तेव्हाची त्याची असहाता , अगतिकता बघण्या सारखी होती आत्तापर्यंत घडलेल्या गोष्टींमुळे नटवर काय चीज आहे आम्हाला कळून चुकले होते. नाहीतर त्याच्या या अविर्भावाने आमची नक्की दाणादाण उडली असती...




**आता नटवर त्या अनामिक शक्तीच्या पुरता आहारी गेला होता त्याचे पाय आमच्या सिटखाली चालले होते आणि मग पुन्हा एकदा नटवर आणि ती अदृश्य शक्ती यांच्यात झटापट सुरू झाली , नटवर स्वत:ला वाचवू पाहत होता... आणि त्याच वेळी आणखीन काही तरी ओढत ही होता.....**

त्याचे हे चाळे इतके सहज आणि वास्तव वाटत होते की त्याला थांबवावं.. ओरडावं, रागवावं अस कुणाला सुचलंच नाही. आता नटवर बऱ्यापैकी संकटातून बाहेर आला होता आणि त्याने आणखीन काहीतरी आपल्या बरोबर आणले होते. मग सर्व ताकद एकवटून त्याने खाली उडी घेतली.... झप्पकन ती वस्तू हातात घेतली आणि तस्साच चपळतेने त्याच्या जागेवर जाऊन बसला. तो सर्वांपासून काही तरी लपवत होता , काहीतरी खूप मोल्यावान... ते जर कुणाला दिसल तर आख्ख जग त्याच्या पाठी लागणार होत. त्याच्यावर खुप मोठ्ठी जवबदारी होती , जगाला वाचवाची जवाबदारी! एवढ्या मोठ्या जवाबदारीचा ताण त्या

phadnissvp@gmail.com

छोट्या जीवावर... काय दृष्या होतं ते..! मी काय सांगू.. ? अशी दृश्यां पाहावीच लागतात. नटवरच्या या मनस्वी आविष्कारांना जर थोड्याश्या स्पेशल इफेक्टची ( वाऱ्याचा झोत , चमकणाऱ्या विजा, गडगडाट, कलर फुल लाइट्स ) आणि म्युझिकची साथ लाभली असती तर तो नक्कीच ऑस्कर विजेता अभिनेता ठरला असता..

खूप वेळ चाललेल्या या संघर्षा मुळे नटवर थकून गेला होता, थोडावेळ तसाच निपचित पडल्यावर तो हळू हळू हालचाल करू लागला. त्याचे बंद डोळे उघडले गेले आजू बाजूला पाहून त्याने पुन्हा एकदा त्याच्या सुरक्षिततेची खात्री करून घेतली , आणि हलकेच मागे लपवलेले हात पुढे आणले. त्याच्या हातात जनू स्वर्ग आला होता.

काय आहे त्याच्या हातात..? काय आहे..??

समोर बसलेल्या प्रत्येकाच्या मनात हे नक्की आलं असणार , आता नटवरचे जुळलेले हात पुढे आले होते. त्याचा चेहरा कमळासारखा खुलला होता.. त्याची नजर हातांच्या बंद शिंपलीवर खिळली होती! ती शिंपली आणि शिंपलीतला अदभुत खजिना! ती शिंपली हलकेच उघडत गेली..... अन त्या शिंपलीच्या उघडण्या बरोबर नटवर चा चेहरा आणखीन आणखीन तेजाळत गेला. त्याचे आधीच मोठ्ठे असलेले डोळे आणखीनं विस्फारत गेले!

काय? काय आहे? त्या शिंपल्यात..!

माझी उत्सुकता आता भलतीच ताणली गेली होती, डोळे नटवरच्या हातावर खिळले होते. मी इतकी अधीर होत असताना.. सुमन काकींच्या चेहऱ्यावर ना पसंतीच्या आठ्या ठळक होऊ लागल्या होत्या.मला मात्र नटवर केव्हा हात पूर्ण उघडतोय आणि मी केव्हा ती वस्तू पाहतिये असं होऊन गेलं... माझी उत्सुकता ताणत ताणत एकदाची नटवर ची ओंजळ उघडली आणि.......... 'फूस..!' त्याच्या हातातला एका तुटक्या हिरव्या रंगाच्या बांगडीचा तुकडा मला दिसला. छे!... काय हे!. हा तुकडा बघण्यासाठी का मी एतकी अधीर होते..! मला माझेच हसू आले , आणि नटवर, त्यावर हसू की चिडू काही कळतच नव्हते. तेवढी उसंतच कधी दिली त्याने, तो त्याच्या उद्योगात मशगुल होता. त्याने कधी मला सांगितले , ये, बघ माझ्या हातात काय आहे. मी स्वत: हूनच तर बघत गेले. मग त्याच्या वर का रागवावे?

नटवरसाठी तो तुकडा खरंच खूप मौल्यवान होता. खजिन्याइतका मौल्यवान!

phadnissvp@gmail.com

तो आता ही मघाच इतकाच खूश होता. त्याच्या चेहऱ्यावरचा आनंद मघाचसारखाच ओसंडून वाहतं होता. आता मी त्याचा चेहरा पाहतं होते त्याचे ते डोळे.. त्यातली खजिना सापडल्याची चमक. अद्भुत... !

केवल अद्भुत!!!

किती निरागस आहे हा!!

मी ही कधी अशीच होते नाही का...

माझ्याजवळही असाच खजिना होता!!!

नटवर मला माझ्याही नकळत त्या दिवसांमध्ये घेऊन गेला. आता ही मी मलाच पाहतं होते , काचपाणी खेळण्यासाठी काचांचे तुकडे जमा करणारी मी , तेव्हा त्या काचा मला खजिन्याइतक्याच प्रिय होत्या नाही का!

काय? काय... ? होतं माझ्या खजिन्यात..! चिंचोक्यांचासाठा , गुंजा, पिंपळाची जाळीदार पान , मोरपीस, नदीच्या पात्रातील वेगवेगळे स्फटिक गारगोट्या, गोट्या, फुलांच्या सुकलेल्या पाकळ्या आणि काय काय ही तर अलीबाबाची गुहा आहे.

मी अलीबाबाच्या गुहेत हरवणारच होते तेवढ्यात नटवरने मला खेचून बाहेर काढल.

कुठे आहे मी?

माझा खजिना!

काही क्षण खरंच कळेला त्या सुंदर विश्वातून मी ही एकदम कुठे आले....

समोर नटवर, तो मला असं सहजासहजी हरवू देणार नव्हता. अरे आता काय करतोय हा?

थोडा वेळ कौतुकाने न्याहाळून अंजारून गोंजारून नटवर त्या काळजाच्या तुकड्याशी संवाद साधत होता. त्याच्या चेहऱ्यावर नक्की कोणते भाव होते.. ? त्यात कौतुक होतं, वेदना होती, एक अनिवार्य व्यथा होती , काळजी, असहायता, एक तुटलेपण त्याचे हसरे ओठ आणि पाणावलेले डोळे पाहिले असतेत तर तुम्हाला ही एक अविस्मरणीय अनुभव आला असता आता तो कोणत्या भूमिकेत आहे सांगू शकाल?..............

मला तर एखद्या चित्रपटातली लेकीची पाठवणी करणारी आईच आठवली.... पाठवणी करतानाची आई अशीच असते नाही! ( भावामृत ओसंडणारी )

अरे अरे... अरे थांब का का टाकतोयस ती काच?

किती चिकाटीने मिळवलेलीस तू तेव्हाचा तो आनंद मी ही न्हाऊन निघाले त्या हसऱ्या क्षणात तू तर अखंड बुडला होतास ना आनंद डोहात मग आता हे का! (हे सगळा मनातल्या मनात.)

प्रेक्षकांना स्टेजवरच्या पात्रांशी असाच संवाद साधावा लागतो ना? आता नटवर कोणत्या स्टेजवर आहे!!!... पाहू ?

त्याने तो काचेचा तुकडा खिडकीतून बाहेर काढला होता..... पण का?

तो ती फुटकी बांगडी फेकून देत होता....

'एवढ्यातच कंटाळा आला का खेळण्याचा ' पण नाही हा कंटाळा नव्हता. कदाचित खेळ, जीवघेणा खेळ....! हा खेळ करताना खुद्द नटसम्राट 'नटवर' ही कासावीस झाला होता. त्याच्या चेहऱ्यावर ओढाताण स्पष्ट दिसून येत होती.... पिळवटलेल्या अंतःकरणाने त्याने तो काचेचा तुकडा खिडकी बाहेर काढला होता, त्याच अंग एकदम आक्रसून गेलं होतं, डोळे गच्चमिटलेले स्स्स...... आता काही तरी भयानक घडणार होतं.

त्यानं ती काच खिडकीतून खाली सोडून दिली. आ आ अरे!... का?

आSSS...............
जणू त्या काचेचीच किंकाळी माझ्या कानात घुमू लागली... आणि ती काच अशी निर्दयीपणे सोडून देणारा नाटक्या माझ्यासमोर बसला होता... आता काही क्षणांपूर्वी ती काच त्याचा ध्यास होती , मग साधना, मग साध्य. किती आत्मीयतेने बघत होता तो त्या काचेच्या तुकड्या कडे! त्या नंतरची ती जीवाची घालमेल.... आणि आताचा हा सुटकारा. कोणते भाव खरे?

या सगळ्याची पंचाईत मलाच. त्याच नटवरला काय? तो आपला त्याच्याच मस्तीत मशगुल.....

काचेचा तुकडा खिडकीतून बाहेर टाकतानाचे गच्च मिटलेले डोळे उघडून त्याने दीर्घ सुटकारा सोडला. "चला एक काम झाले " चा आविर्भाव. हा बहुतेक एकपात्री प्रयोग होता त्यातला हिरो नटवर व्हीलन

नटवर, बाकी सारी पात्र ही तोच... त्यानंतर ही त्याचे काही ना काही चाळे चालूच होते आणि माझं विचार चक्रही! त्यानं काही ना काही करत राहावं आणि मी त्याच्या त्या हालचालींतलं नाट्य अनुभवत राहावं.....

"मम्मी" त्यानं परत एकदा त्याच्या आईला हाक मारली... दोन्ही हात नमस्कार केल्यासारखे एकमेकांना जोडले आणि कानाच्या दिशेला नेले त्या जोडलेल्या हातांवर मान तिरकी करून अलगद टेकवली आपल्या पापण्या मिटून घेतल्या, तो त्याच्या आईला आपण झोपत आहोत असे सांगत होता! पलीकडून "सोजा".. अस तुटक उत्तर आलं. ती परवानगी घेऊन नटवर त्याच्या जागेवर झोपी गेला.

तो खरंच झोपलाय की.... हा ही त्याच्या कोणत्या भूमिकेचाच भाग असणार आहे हे पाहायला आता मी थांबू शकत नव्हते, माझं स्टेशन जवळ येत होत. मघाचच्या माझ्या आजूबाजूला बसलेल्या बायका , मुली केव्हाच उठून गेल्या होत्या. त्या जागेवर एक टवटवीत मुलगी येऊन बसली! बाकीचे आम्ही सगळे जण शिणवटलेले सैलावलेले दिसत होतो, ( एक ती सोडून!. ) ती मुलगी आताच उठून आवरून आल्यासारखी ताजी-तवानी, पावडरच्या जाहिरातीतल्या मॉडेलसारखी एव्हर फ्रेश , उत्साहाने सळसळणारी ब्युटी क्वीन माझ्याशेजारी येऊन बसली. नेव्ही ब्लियू कलरचा स्कर्ट त्यावर त्याच रंगाचा कोट, त्या मधून डोकावणारी फिकट निळ्या गुलाबी रंगाची कॉलर हा तर एअर इंडियाचा युनिफॉर्म.. तिची बहुतेक नाइट शिफ्ट असावी, त्या नंतर तिला तसाच पोशाख केलेली आणखीन एक ब्यूटीक्वीन येऊन मिळाली!...



डब्यातलं नाट्य असच रंगणार होत... नवे कलाकार स्टेज वर येत होते नवे प्रेक्षक आसनस्थ होत होते. मला आता उतरायचं होत. मी उठले माझी जागा क्षणार्धात भरली गेली. उतरण्या आधी नटवरच्या मम्मी ला शोधण्याचा प्रयत्न केला.. आतापर्यंत मी तिचा फक्त आवाजच एकला होता तोही अगदी जेवढ्यास तेवढा , आणि समोर बुरख्यांची ही गर्दी! त्यातला कोणता बुरखा म्हणजे नटवरची मम्मी हे काही मला कळू शकले नाही.

phadnissvp@gmail.com

त्या बुरख्यांकडे आणि नटवर कडे एकदा बघून मी कौतुकाची पावती फाडली.. आणि माझ्या स्टेशनवर उतरले... (नटवरला बरोबर घेऊन!)

**नटवर माझ्या डोक्यातून कधीच उतरणार नव्हता.. अगदी आता या कागदावर उतरवेपर्यंत तो माझ्या बरोबरच होता. त्याच पुढे काय होईल?... कोण बनेल तो? नटवर एक नटसम्राट की नटवर नाटक्या....?**

======================

**स्वाती फडणीस**




स्टेशन मॅप

# माझ्या समोर बसलेली ती

ती तिच्या दुःखात गर्क होती. तिला कदाचीत तिच्या मित्र-मैत्रिणींच्या बोलण्याचाही त्रासच होत होता.. सरांनी दाखवलेली आपुलकी , आईचं काळजी करणं जाचक वाटत होत. पण या अशा वेळी कोणीच तिच्याकडे लक्ष दिलं नसतं तर तिला आवडलं असतं का?




स्टेशन मॅप

# माझ्या समोर बसलेली ती

तारीख, वार, वेळ.. काही काही आठवत नाही आहे,आठवती आहे.. ती, फक्त ती..
माझ्या समोर बसलेली ती;

मी पार्ले की सांताक्रुझ या पैकी कोणत्या तरी स्टेशनवर लोकलमध्ये चढले , ती माझ्या आधीच लोकल मध्ये बसलेली होती. लोकलमध्ये फारशी गर्दी नव्हती.. नाही..! गर्दी नव्हतीच. मला बसायला विंडो सीट मिळाली. ती वाऱ्याच्या दिशेस असलेल्या सिट वर बसलेली होती , खिडकीजवळची जागा रिकामी असून तिथे न बसता थोडंसं अंतर सोडून.. दुसऱ्या कोणाला ही तिथे बसता येऊ नये अशी. तशी मी सहसा बसायला जात नाही , दारा जवळच उभी राहते.. त्या दिवशी थोडा थकवा जाणवत होता.. म्हणून आत गेले, बसले. ती ही निवांत बसलेली.. तिची सैल सोडलेली मान मागे डब्याच्या पार्टिशनच्या आधारे टेकली होती.. डोळे मिटलेले.. मोठ्याशा कपाळावरची एक शीर टम्मफुगलेली, चेहऱ्यावर थोडी उदासी, थकवा, दुःख, वेदना की काहीतरी.. ? होत. मलाही प्रचंड थकवा जाणवत होता..! मी सीट वर टेकले.. तिच्याच सारखी मान मागे झोकून दिली.. डोळे मिटून घेतले.. दोन एक मिनिटं अशीच गेली.. आणि तिचा फोन वाजला.

बोबड्या मुलीच्या आवाजातलं कोणतंसं गाणं सुरू झालं.. खूप संथ , सौम्य, लडिवाळ, मधुर.. तरी पण शांततेला तडा गेलाच..! मनाला छानशी गुंगी येत होती.. सगळ्या जाणिवा बधिर झाल्या होत्या.. एक शांतशी लहेर कवेत घेत होती.. मी डोळे उघडले नाही. अगदी मनातल्या मनातही चुकचुकले नाही..! पुन्हा एकदा गुंगीच्या आधीनं जाण्याचा प्रयत्न केला.. तिने फोन कट केला. मी सुखावले..! पुन्हा एकदा निरवतेने बाहू पसरले.. या वेळेला शांततेला वेदनेचा स्पंद होता..! माझ्या मनातली.. की आणखीन कोणती? अस्वस्थता डाचत होती , अगदी दूर वरून कदाचित एखाद्या दुसऱ्याच ग्रहावरून किंवा त्याच्याही पलीकडून कुठून तरी हलकीशी मुसमूस कानी आली.. माझ्या पापण्यांनी उघडण्यास नकार दिला.

कोणी तरी रडतंय..
कोणी तरी रडतंय..!
कोणी तरी रडतंय. संवेदना जाणिवांना जागवू लागली..
क्षणभर डोळे उघडले गेले.. कोणतीही नवीन प्रतिमा उमटवून न घेता, परत बंद झाले.

phadnissvp@gmail.com

फोन वाजला..

कोणताही संवाद न होता, परत बंद झाला..

फोन परत वाजला.. परत, परत, वाजतच राहिला..!

You're my Honeybunch, Sugarplum
Pumpy-umpy-umpkin, You're my Sweetie Pie
You're my Cuppycake, Gumdrop
Snoogums-Boogums, You're the Apple of my Eye
And I love you so and I want you to know
That I'll always be right here
And I love to sing sweet songs to you
Because you are so dear..

इतक्यांदा! की.. तो रिंग टोन , ते छानसं गाणं मला तोंड पाठ होवून गेलं. गाण्याच्या शब्दांमधला अर्थ मनात झिरपवत राहिलं..! अलवार हातांनी गोंजारल्यावर होतो तसा माझा थकवाही बराचसा कमी झाला. ती फोन घेतच नव्हती.. आणि ते यायचे बंदही होत नव्हते. माझं कुतूहल उगाच चाळवलं जात होत. तरी तशीच डोळे मिटून बसून राहिले.. तिच्या रिंगटोनच्या गाण्यानं मनाची मरगळ गेली असली तरी डोळ्यांना आराम हवा होता. बऱ्याच वेळा मला गाणं ऐकवल्या नंतर.. शेवटी एकदाचा तिने फोन घेतला..

"हॅलो..! "..........................................."हॅलो sss.. "

"कोई मुझे थोडी देर चैनसे जिने क्यो नही देता.. यार..! "

म्हणत तिने फोन कट केला.. आणि ती अचानक रडायलाच लागली. म्हणजे मघाचचा तो मुसमुसण्याचा आवाज हिचाच होता तर..!

phadnissvp@gmail.com




काही विचारावं का? छे..! कशाला..? तिला शांत राहायचं आहे, आणि मलाही. कोणी सांगितलाय नाही तो उपद्व्याप. आपण आपले डोळे बंद करून घेतले की झालं.. सगळं जग पापण्यांच्या पलीकडे... अगदी खोलीच किंवा घराचं दार बंद करून घेतल्या सारखं. तरी नुसते डोळे बंद केल्याने शांतता मिळत नाही.. नाही.. ? कान बंद करण्यासाठीही काही करता यायला हवं होत. आणि केलेच जरी कान बंद तरी तेवढ्याने काय होणार..!दृश्यांवर पडदा टाकता येईल.. आजू बाजूचे आवाज म्युट करता येईल.. पण मन , ते जाग असलं की पापण्यांच्या आडही दृश्य दाखवतं.. गोंगाट करतं. आताही माझे डोळे बंद असताना त्याला जाग आली होती.. आणि पापण्यांपलीकडे थांबवलेली ती जशीच्या तशी माझ्या बंद दारातून आत येऊन समोर ठाकली होती.

**माझ्या समोर बसलेली ती ; हमसून हमसून रडत होती..**
**जराही का गती मंद न करावी, झुलता झुलता म्हणत होती..!**

माझं मन समोरच्या दृश्याला शब्दात रंगवू लागलं.. आणि तेवढ्यात पुन्हा एकदा फोन वर तेच मघाचचं गाणं सुरू झालं.. माझ्या शब्दांची लय बिघडली.. आता डोळे बंद करून बसण्यात काहीच अर्थ नव्हता.. मी डोळे उघडेच ठेवून समोर दिसेल ते ऐकायचं बघायचं ठरवलं. त्या नंतर तिच्या मोबाईलवर फोन येतच राहिले.. कधी मैत्रीण , कधी मित्र, कधी आई, सर, मित्र, मैत्रीण.. उफ..! तिला आणि तिच्या फोनला क्षणभराचीही उसंत म्हणून नव्हती.

You're my Honeybunch, Sugarplum
Pumpy-umpy-umpkin,

"हॅलो.. "
"तुला माहिती आहे.. आज काय झालं ते.
पहिल्यांदा, लाईफ मध्ये पहिल्यांदाच गं.. मला कमी मार्क मिळाले.
मला कधी कमी मार्क्स मिळूच शकत नाहीत का..?

phadnissvp@gmail.com

मी नेहमी फर्स्ट, सेकंड येतेच ना..!

मला माहिती आहे,, मला कमी मार्क पडलेत.

फर्स्ट टाइम..! फर्स्ट टाइम इन लाईफ.. "

हू ऽ ऊह ऽ उहू ऽऽऽ

स्स.. स.. ऽऽऽ "अगं रडू नाही तर काय करू... हु ऽ ऊह ऽ उहू ऽऽऽ

थांब.. थांब... मी तुला नंतर कॉल करते........ आईचा फोन येतोय..

हो.. करते गं तुला फोन.

आधी मम्मीशी बोलूदे.. मघापासून तीनदा कॉल येऊन गेलाय माहिती आहे. तिच्यासाठी मी म्हणजे अजून कुक्कुलं बाळच आहे. (तिचा फोनवरला एकतर्फी संवाद माझ्या कानांवर आदळत होता.)

"हॅलो..

मम्मी तू सारखा सारखा फोन का करते आहेस..! तुला एकदा सांगितलं ना मी माझी काळजी घेऊ शकते. मी घरी येत नाहीये, तू वाट नको बघूस..

अगं.. ज्यूस..!

माझ्या कडे वेळ नाहीये गं..!

बाहेर कुठे ज्यूस मिळतच नाही का..?

मी घेईन ज्यूस.. आता तू फोन ठेव. मला कोणाचातरी कॉल येतोय.

नको करूस काळजी..! " (फोन कट करून ती पुन्हा हमसून हमसून रडू लागली.)

**मैत्रिणीशी बोलतानाचा आवाज आणि आता आईशी बोलतानाचा आवाज एकाच मुलीचा असून त्यात हा एवढा फरक. मैत्रिणीशी बोलतानाची ती आर्जव , मवाळपणा आईशी बोलताना कुठे निघून गेला.. आणि त्याची जागा हुकमी जरब, आणि अधिकाराने कधी घेतली हे तिचं तिला ही कळलं नसावं.**

You're my Honeybunch, Sugarplum

" हॅलो"

हो आताचं पायलचा फोन येऊन गेला..

हो रे..

एक तर मला टेस्टमध्ये कमी मार्क्स मिळालेत.. आणि कोणी मला साधं रडूही देत नाहीये...! पायल , मम्माचा, आणि सरांचा.. या फोन नि नुसता वैताग आणलाय..!! तुला माहिती आहे..

मला सर काय म्हणाले.. त्यांना म्हणे, माझ्याशी बोलायचं आहे.. अरे, मग फोन केला आहे ना तर बोलावं ना..! तर नाही, मी परत क्लासकडे जायला पाहिजे मग हे मला डोस देणार.. आणि मी डफ्फरसारखी हो.. नाही..! हो.. नाही..! करत राहणार.. यांना कळतच नाही का.. ? मला ठाऊक आहे , मला कमी मार्क्स मिळालेत.. हे महत्त्वाचं वर्ष आहे.. मी अभ्यासाकडे लक्ष दिलं पाहिजे.. हेच सगळं मला ते पुन्हा पुन्हा सांगणार..! बरं समोरच बोलायचं होत तर क्लास नंतर लगेच बोलता नसतं का आलं..? मी ही एवढी लांब आल्यावर मला परत क्लास मध्ये कसे बोलावतात हे..!

आणि साधी टेस्टच होती ना रे..!
फर्स्ट टाइम..
लाईफ मध्ये फर्स्ट टाइम..
सिक्सटीन आऊट ऑफ ट्वेंटी मिळाले.. तर काय आकाश कोसळलं का..?
मी कधी थोडंसं रिलॅक्सही होऊ नये का?
चलं.. रे..! मी तुला नंतर फोन करते.. पायलचा फोन येतोय.
(आता ती बांध फुटल्यासारखी बोलत सुटली.)

मला काही न बोलता.. काही न विचारता एक एक करून तिच्या दु:खाची,उदासीची, रागाची कारणं कळत गेली..

**माझ्या समोर बसलेली ती; हमसून हमसून रडत होती..**
**त्याच त्या आवर्तनात, व्यथा तिची गुंजत होती..!**

हॅलो..!
माझा फोन ना.. वाजतोय.. सारखा सारखा वाजतोय..!

**( ती फोन आल्यावर चिडत चडफडत होती तरी तिला फोन हवे होते.. नाहीतर सारखा सारखा वाजणारा मोबाईल बंद करून ठेवता नसता का आला.?)**

अग एंगेज येईल नाहीतर काय होईल.. मघापासून इतके फोन येऊन गेलेत.. की काय सांगू.. एक फोन ठेवायच्या आधी दुसरा.. आधी सर , मग पायल, मम्मी तर सारखीच कॉल करते आहे.. आताही मला पायलचा फोन असेल वाटलं तर तू आणि सगळ्यांनची आपली एकच चौकशी.. कोणाला कधी कमी मार्क पडतच नाहीत का..? मग सगळे माझ्याच मागे का लागलेत.. माहीत आहे..! पप्पा मुळे.. तो डीन आहे ना.. त्यामुळं हे सगळं.

हू ऽ ऊह ऽ उहू ऽऽऽ स्स.. स.. ऽऽऽ

तुला सांगू, मगाशी सरांचा फोन आला होता.. मला परत क्लास मध्ये बोलावता आहेत.. मी कशासाठी विचारलं तर म्हणे आल्यावरच बोलेन.. आता मी परत क्लासला जाऊ का.. ? तिकडून मम्मीचे कॉलवर कॉल येताआहेत.. अजून घरी का आली नाहीस.. ज्यूस करून ठेवलाय.. किती काळजी करणार ही आता मी काय कुक्कुलं बाळ आहे का..? मी बाहेर ज्यूस पिऊ शकते ना..! बाहेर कुठे काही मिळतच नाही का..? इथे सर मला क्लास मध्ये परत बोलावतायत.. ते झालं की मला लग्गेच दुसऱ्या क्लासला जायचंय.. वेळ आहे का मला घरी जायाला.. ? सरांना नाही येत म्हणाले तर ते घरी फोन करतो करून धमकावतात.



म्हणजे अजून एक लेक्चर..! आता पर्यंत त्यांनी घरी फोन केलाही असेल. माहीत नाही आता घरी जाऊन काय काय ऐकावं लागेल.. मला खूप कंटाळा आलाय गं. त्यात हे फोन.. मला कोणी सुखानं रडूही देत नाही..! फोन ठेवते हं.. प्लिज, रागावू नकोस..!!

**हे असच किंवा या हून मोकळेपणानं आईशी बोलता आलं नसतं का? अभ्यासातून ब्रेक घ्यावासा वाटला तेव्हा , किंवा परीक्षेवरून आल्यावर किंवा अगदी आता सर फोन करून घरी कळवतो म्हणाले तेव्हा. तसं बोलता आलं असतं तर सगळं सोप्पं झालं असत नाही..! आणि मग आईची माया , काळजी अशी जाचक बनली नसती.**

**माझ्या समोर बसलेली ती; हमसून हमसून रडत होती..**
**मायेच्या रेशमी वेढ्यात, फूलपंखी कोंडली होती..!**

फोनवर बोलत बोलत कधी तरी ती ट्रेन मधून उतरून गेली,

phadnissvp@gmail.com

# लोकल गोष्टी

आणि मी ती दिसेनाशी होईपर्यंत तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे बघत राहिले. इतका वेळ तिच्या भावनांच्या उमाळ्यापुढे, शब्दांच्या धबधब्यात तिच्या दिसण्याकडे फारसं लक्षच गेलं नाही. त्यामुळे स्मृतीत ठसली ती तिची पाठमोरी आकृती. ती मुलगी हळूहळू नजरेआड होत दिसेनाशी झाली.

मी तिच्याशी बोलावं की नाही.. हा प्रश्न मुळी नव्हताच , इतक्या वेळात रडताना.. बोलताना.. मी तिच्या खिजगणतीत नव्हतेच. ती तिच्या दुःखात गर्क होती. तिला कदाचीत तिच्या मित्र-मैत्रिणींच्या बोलण्याचाही त्रासच होत होता.. सरांनी दाखवलेली आपुलकी , आईचं काळजी करणं जाचक वाटत होत. पण या अशा वेळी कोणीच तिच्याकडे लक्ष दिलं नसतं तर तिला आवडलं असतं का? तिचं तीच जाणो..

अशा वेळी प्रश्न पडतो.. मोबाईल फोन शाप की वरदान..?
**कधीही कोणालाही हाकेच्या अंतरात आणून ठेवणारं हे तंत्रयंत्र माणसाचा असला नसला निवांतपणा हिरावून तर घेत नाहीये ना..!**

**माझ्या समोर बसलेली ती; हमसून हमसून रडत होती..**
**"माझे मज हवे.. क्षण काही," समजून घ्या म्हणत होती..!**

**आणि तरी मी फक्त शांतपणे बघत होते. कधी कधी काही न करणंच करण्यासारखं असतं नाही..!**



================================================

**स्वाती फडणीस**

स्टेशन मॅप

# भिकारी पोट्टा

आजपर्यंत कुठल्याच झाडू घेऊन फिरणाऱ्या या मुलांनी पूर्ण डबा नीट/ पूर्ण झाडल्याच दिसलं नाही. आणि तेच ते नाटक रोज रोज बघणारे त्याला परत परत भुलतात.. काम करायचंच नसेल तर ते करण्याच नाटक तरी कशाला..? हातात झाडू न धरता ही भीक मागता येतेच ना..!




स्टेशन मॅप

## भिकारी पोट्टा

लोकलमध्ये नेहमीच बऱ्याच किरकोळ घटना घडत असतात.. इतक्या सर्रास दिसणाऱ्या सामान्य.. की आपल्या लक्षातही येत नाहीत. मग त्यांत लक्ष घालणं.. त्यांना लक्षात ठेवणं या तर फार दूरच्या गोष्टी..! पण रोजच्याच प्रवासात रोजच्या प्रवाशांपैकी कोणी कधी रोजची अनास्था दूर सारून नेहमी पेक्षा वेगळं वागताना दिसतं..



आज तसंच झालं. ऑफिसमधून घरी येताना.. नेहमीप्रमाणे एक मुलगा डब्यात झाडू मारायचं निमित्त करून भीक मागायला आला. कोणी 'जाओ, जाओ' करून हटकलं , कोणी त्याचा झाडू अंगाला लागू नये म्हणून पाय वरती उचलून घेतले ( तसा सेकंड क्लासच्या डब्याच्या मानानं फर्स्ट क्लासच्या डब्यातल्या सीट खाली फारसा कचरा नसतो. ) त्या मुलानं ही उगाच इकडे तिकडे कचरा सारवण्या सरकवण्याचं सोंग वठवून पोटावर जोरात चापट्या मारत भीक मागायला सुरुवात केली.. अशा वेळी निदान दोन तीन हात तरी पैसे द्यायला पुढे येतात. आज मात्र कोणी ढिम्म लक्ष देत नव्हतं.. त्याचं पोट वाजवणं सुरूच होतं. याच्या पुढची स्टेप म्हणजे बसलेल्या बायकांच्या हाताला पायाला हात लावून लक्ष वेधून घेणं. बऱ्याचदा तो असा जवळ येऊ नये म्हणून ही कोणी एखादं नाणं देऊन टाकतं. ( स्पेशली सकाळी ऑफिसला जायच्या वेळेला घरातली काम आटपून नुकतीच अंघोळ करून आवरून सावरून ऑफिसला जात असताना ते कळकट काळे हात खरंच नकोसे वाटतात. ) आता तो ती ट्रिक वापरणारच होता.. तेवढ्यात माझ्या

phadnissvp@gmail.com

शेजारी बसलेल्या पारशी आंटीने त्याच कचरा उडवणं भलतंच मनावर घेतलं, आणि त्याला डब्यातून बाहेर घालवण्याचा पवित्रा घेतला. तसा हा ही बऱ्याचदा दिसणारा प्रसंग. अशा वेळी कधी ना कधी एखादी बाई असा आरडा ओरडा करतेच..!

एक दोनदा हाकलून जाईल तर तो भिकारी कसला , असा ज्याच्या त्याच्या शब्दांनी अपमानित होत राहिला, दुखावला गेला,किंवा पडत घेत राहिला तर त्याचा तरी निभाव लागायचा कसा.. ? तो तर आजू-बाजूच्या गर्दीच्या वरताण गेंड्याच्या कातडीचा. ( तो कसला आंटीच्या हुसकावण्याला दाद देतोय. आंटी अजून एक-दोन वेळा ओरडेल आणि स्वतःशीच धुसफुसत आपल्या जाग्यावर बसेल. ) शेवटी भीक मागणं हाच त्याचा धंदा आहे.

**आज मात्र वेगळंच झालं.. चवताळलेली आंटी एक-दोनदा ओरडली खरी.. पण मग तिलाच काय वाटलं कोण जाणे. तिने जातीनं उभं राहून त्या पोट्ट्या कडून अख्खा डबा नीट झाडून घेतला.. दाराशी सरकवलेला सगळा कचरा त्याला बाहेर टाकायला लावला.. आणि मग त्याच्या हातावर चांगली दहाची नोट ठेवली. पण त्यानंतर पुढचं स्टेशन आल्यावर एक सेकंद ही त्याला डब्यात ठेवून घेतलं नाही.. की तिच्या व्यतिरिक्त आणि कोणासमोर हात पसरू दिला नाही.**




डबा जरा साफ झाला. त्या मुलाला जर खरंच काम करायचं असेल तर आजची ही दहाची नोट त्याला नक्कीच सुखावून गेली असेल. पण भीकच मागायची असेल तर इथून हुसकवल्यावर त्यानं नक्कीच लगेच दुसरा डबा गाठला सुद्धा असेल, तिथेही हेच नाटक करून तो पुन्हा पोट बडवत भीक मागत असेल. आजपर्यंत कुठल्याच झाडू घेऊन फिरणाऱ्या या मुलांनी पूर्ण डबा नीट/पूर्ण झाडल्याच दिसलं नाही. आणि तेच ते नाटक रोज रोज बघणारे त्याला परत परत भुलतात.. काम करायचंच नसेल तर ते करण्याच नाटक तरी कशाला.. ? हातात झाडू न धरता ही भीक मागता येतेच ना..! आता हा मुलगा ज्या डब्यात शिरलाय तिथे त्याला अशीच कोणी आंटी भेटेल का..? **अशीच एक तरी आंटी प्रत्येक डब्यात पाहिजे नाही. जी भिकाऱ्याला रिकाम्या हातानं ही पाठवणार नाही.. आणि त्याच्या मोकळ्या हातांना आणखीन सोकावू ही देणार नाही.**

phadnissvp@gmail.com

आंटीनी खूपच चांगली ऍक्शन घेतली होती. मला त्यांचं अगदी मनापासून कौतुक वाटत होतं. खरं तर त्यांना ते तसं बोलून दाखवायला पाहिजे होतं. पण नेहमीच्या सवयीने मी नुसतंच स्मित केलं. ते त्यांच्यापर्यंत पोहचलं असावं.. अशी आशा करते. त्यांना तशी त्याची काहीच जरूर नव्हती. त्यांनी त्यांच्या मनात आलेलं कार्य पूर्णत्वाला नेलं होत , त्याचं समाधान त्या प्रेमळ पिकल्या चेहऱ्यावर पुरेपूर झळकत होतं.

बसता बसता त्या माझ्यासमोर आणखीन एक वाक्य बोलून गेल्या..

**आपण दिवसभर काम करतो तेव्हाच आपल्याला पैसे मिळतात ना..! मध्ये कुठेतरी भिकाऱ्यांना पैसे द्यावे की नाही वर चर्चा वाचली होती.. त्या चर्चेला या पारशी आंटीने जणू उत्तर दिलं होतं.**

================================

**स्वाती फडणीस**



स्टेशन मॅप

# हातातला खजिना

एक अर्ध्या-मुर्ध्या वयाची मुलगेली विक्रेती लोकलच्या दाराशी उदासपणे उभी असलेली दिसली.. थोड्याच वेळात तिच्या दोन्ही डोळ्यातून निःशब्दपणे गंगा-जमुना झरू लागल्या.. आणि समोरच उभ्या असलेल्या मला फक्त बघ्याच्या भूमिकेत राहवेना..!




स्टेशन मॅप

## हातातला खजिना

रोज सकाळी राजसला शाळेत सोडल्यावर मी ऑफिससाठी स्टेशन गाठायचे.. राजसची शाळा पावणेनऊला सुरू व्हायची त्यानंतर अगदी चालत निघाले तरी नऊ सव्वा नऊ पर्यंत मी पार्ले स्टेशनवर पोहचायचेच. माझ्या कडे तसा बराच वेळ असायचा.. दोन नंबर प्लॅटफॉर्म वर चेंगरा-चेंगरीत घुसून लोकल पकडावी लागायची नाही. सहा नंबर प्लॅटफॉर्म वर नऊ अठरा चर्चगेट लोकल लागलेली असायची. त्या लोकलने मी आरामात जाऊ शकायचे.. आणि जरी काही कारणांनी ही लोकल चुकली तरी पुढच्या लोकलनी मी वेळेत ऑफिसला पोहचायचे. त्यामुळे तसा बराच निवांतपणा होता. आणि मन निवांत असलं की त्याला आजूबाजूच दिसतं.. किंवा दिसलेलं आपल्या पर्यंत पोहचत अस म्हणायला हरकत नाही.

मी स्टेशनवर पोहचायचे तेव्हा लोकल ट्रेनमध्ये.. पिना , टिकल्या, कानातले.. अशा बारीक-सारीक वस्तू विकणाऱ्या बायका त्यांची हातातला खजिना व्यवस्थित लावण्यात मग्न असायच्या.. एकात एक दाबून बसवलेले शर्टाचे बॉक्स त्यातल्या तऱ्हे-तऱ्हेच्या वस्तू पूर्णपणे उसकटून पसरून ठेवलेल्या असायच्या.. आणि या बायका एकमेकींशी बोलत त्या सगळ्या वस्तू नीटनेटक्या आहेत की नाहीत हे तपासून पुन्हा त्याच शर्टच्या बॉक्स मध्ये मनाप्रमाणे व्यवस्थित लावण्यात गुंग झालेल्या असायच्या. त्याच वेळी त्यांच्या मांड्यांवर त्यांची तान्हुलीही निवांत पहुडलेली असायची.. मग कोणीतरी चहावाला येऊन या बायकांना चहा आणि पाण्याचे ग्लास देऊन जायचा.. ट्रेन येईपर्यंत मी रोज या बायका , त्यांची आवर-सावर, त्यांच्या हालचाली, त्यांची मुलं, अगदी उत्सुकतेने बघायचे.

पूर्वी साधारण कॉलेजच्या चौथ्या वर्षाला असताना. ताईला मुलगी झाल्या नंतर. तेव्हा त्या गडबड गोंगाटातही गुडुप झोपलेल्या मुलांचं.. त्यांच्या निवांत झोपण्याच खूप आश्चर्य वाटायचं. आणि मग मी या अशाच उत्सुकतेनं ती पाठीवर बांधलेल्या झोळीतली शांत झोपलेली मुलं पाहायचे.झोळीतून जाणवणार त्यांचं लहानग्या चेंडू सारखं वाटणारं डोकं , कधी मधी क्वचितच हालणारे त्यांचे ते इवलेलेसे पाय.. कधी रडणं नाही की उसळणं , चळवळ करणं नाही. या बायकांची मुलं ह्या एवढ्याश्या वयापासूनच समंजस असतात की काय.. ? मग पुढे कधीतरी त्यांच्या त्या तशा निपचीत पडून राहण्यामागचं कारण कळलं , इतक्या छोट्याशा मुलांना अफू घातली जाते आणि ती ही त्यांच्याच जन्मदात्या आई कडून. हे कळल्या पासून ती क्लांत गाठोडी बघणं सुटूनच गेलं.. ते हे आतापर्यंत.

phadnissvp@gmail.com

विक्रीला सुरुवात करण्या आधी या बायकां मात्र निवांतपणे बसलेल्या असताना मांडीवरच्या मुलांचे लाड करायच्या, त्यांच्याशी बोबड्या आवाजात काहीबाही बोलायच्या, त्यांना खेळवायच्या, खाऊ पिऊ घालायच्या.. म्हणजे निदान सगळ्याच्या सगळ्या झोळीवाल्या बायका मुलांना अफूची गोळी चाटवत नसाव्यात.

**त्या बायकांच आवरणं.. सावरणं.. बघता बघता मला त्या आवडायला लागल्या.. विशेषतः त्यांच्यातल्या पंधरा सोळा वर्षांच्या कोवळ्या लग्न झालेल्या मुली काही वेगळ्याच दिसायच्या.. त्यांचे ते चापून-चोपून बसवलेले केस, भांगात भरलेला भरगच्च सिंदूर, कपाळावरची उठून दिसणारी ठसठशीत टिकली त्या खाली लावलेली गंधाची हलकीशी रेघ. केसांमध्ये माळलेला गजरा.. अगदी साधी पण नीटनेटकी नेसलेली साडी त्यावर कॉंट्रास मॅचिंग साधणारा ब्लाऊज, त्यांची रेखीव अंगकाठी, आणि मला सगळ्यात जास्त आवडणारे त्यांच्या चेहऱ्यावरचे निरागस कोवळे भाव.**

त्यांच्यातलीच एक मुलगी/बाई मी ज्या ट्रेन मध्ये चढायचे त्या ट्रेनमध्ये चढायची.. तिच्या हातात एक टिकल्यांचा बॉक्स, एक लहान मुलींसाठी केसांना लावायच्या रंगीबेरंगी फुला मण्यांनी सजवलेल्या पिनांचा बॉक्स, एक प्लॅस्टिकच्या छोट्या मोठ्या केसांना लावायच्या चिमट्यांचा बॉक्स त्यात बनाना क्लिप्स , बटरफ्लाय क्लिप्स, बिडस असे काय काय असायचे , आणखीन एक वेगवेगळ्या प्रकारच्या ब्रेस्लेट आणि गळ्यातल्यांचा स्वतंत्र गुच्छ तिच्या हातात असायचा.. ट्रेनला फारशी गर्दीही नसायची त्यामुळे काही जणी तिच्या हातावरल्या दुकानातल्या वस्तू बघण्यात रस घेत. मलाही ब्रेस्लेट , टिकल्या, पिना असे काहीबाही घ्यायला आवडायचे.. तरी रोज रोज काय घेणार..? एखादं वेळा टिकल्याची तीन-चार पाकीट घेतली की ती एक-दोन महिने सहज पुरतात. कधीतरी दोन-तीन पिना घेतल्या.. एकदा वापरली जाणार नाहीत माहीत असून दोन ब्रेस्लेटस घेतली. ही मुलगी ही अतिशय निरागस अन कोवळी होती.. सकाळी सकाळी तर ती खूपच ताजीतवानी प्रफुल्लित वाटायची.. आता रोज रोच चेहरे बघून माहीत झाल्यामुळे ही मुलगीही मी काही घेतलं नाही तरी तिच्या बॉक्स मध्ये मला उचकपचक करू द्यायची.. आणि कधी मधी काही वस्तू घेतल्या असल्यामुळे मलाही तिचे बॉक्स मागून घ्यायला भीड वाटायची नाही.

ट्रेन मध्ये विशेष गर्दी नसताना या अशा फेरी वाल्यांचे डब्यात येणे चूक की बरोबर असा विचारही कधी मनाला शिवायचा नाही. पण तेच गर्दी मधून प्रवास करताना किरकोळ सामान विकणाऱ्या या बायका , लहान मुलं, विक्रेते बनून किंवा भीक मागायला म्हणून डब्यात चढणारी आंधळी अपंग माणसं.. नकोशी वाटतं. कधी मधी कोणी त्यांना डब्याच्या दाराशी अडवायचं.. कोणी त्यांच्या विक्रीसाठी चालवलेल्या उंच

स्वरातल्या हाकाळ्यांनी वैतागायचं.. तर कोणी त्यांना डब्यात चढल्याबद्दल बोलत असायचं कधी कोणी हाकलून द्यायचं.. तरी पण तेच काम करून पोट भरणारीही माणसं दुसऱ्या दिवशी परत डब्यात दिसायची.

मला रोज सकाळी दिसणाऱ्या त्या बायकांनाही यातून जावं लागत असेल..! असं कधीतरी मनात येऊन जायचं. आणि तेवढ्यात डब्यात चढलेली माझी ती सुमुखी दिसायची.. ती दिवसेंदिवस आणखीन आणखीनच सुंदर दिसू लागली होती. तिच्या गळ्यातली काळी पोत. नाकात चमकणारी चमकी.. आणि त्या चमकीहून जास्त लखाकणार तिच्या ओठांच्या महिरपीतलं हसू.. या सगळ्या विचारांना कुठच्याकुठ दूर सारून टाकायचं.

**या सुमुखीकडे पाहिलं की नेहमी वाटायचं लोक सौंदर्याची फक्त व्याख्या गोऱ्या रंगाशी कशी काय बांधून ठेवतात बरे..! त्यांना काळ्या सावळ्या रंगातले हे रेखीव नाक डोळे , पांढरं शुभ्र निर्मळ हास्य , काटक प्रमाण बद्ध अंगकाठी दिसतच नाही की काय.. ? खरं तर सौंदर्य स्पर्धांच्या मंचावर या मुलींना उभं करायला हवं. एका हातात तीन-चार वजनदार खोकी आणि दुसऱ्या हातात लटकती झुंबर वॉक करणाऱ्या त्या कॅटच्या भाच्यांचं कर्तब तर ( वाघीण ) झाशीच्या राण्यां म्हणवण्याच्या तोडीच.**



आता तर माझी सुमुखी दिवसेंदिवस अधिकाधिक सुंदरच दिसत होती.. तिच्या काटक शरीरावरची गोलाई उठून दिसू लागलेली.. तिचा हसरा मुखडा वेगळ्याच तेजानं उजळला होता. काही दिवसातच ती थोडी पाठीमागे झुकल्या सारखी वाटायला लागली.. तिचं पोटही कळून येण्या इतकं पुढे आलं होत.. तरी ती तशीच अंगावरचा आणि खांद्यावरचा भार पेलत सराईतपणे तिच्याकडच्या वस्तूंची विक्री करत दिवसभर या डब्यातून त्या डब्यात फिरतच होती.

phadnissvp@gmail.com

**कसलं कौतुक नाही.. की कोणती तक्रार नाही. चेहऱ्यावर तेच स्वर्गीय नित्यानंदी भाव..! आणि मग मध्येच एक आठवडा-पंधरा दिवसांपुरती ती कुठेशी गायब झाली.. आणि परतली ते पोटावरची गोलाई पाठीवरती तोलतंच. पण आता मात्र ती पूर्वीसारखी दिसत नव्हती. या आठवड्या-पंधरा दिवसात तिची पूर्ण रयाच गेली होती. नाकात चमकी होती , गळ्यात काळी पोत होती, कपाळावर मोठी टिकली होती.. चापून-चोपून बसवलेले केस तेवढे अस्ताव्यस्त विस्कटले होते.. नीट-नेटकी साडी अंगाला गुंडाळल्या सारखी दिसत होती.. आणि डोळ्यातल्या तेजाची जागा थकव्यानं घेतली होती. आताही ती चालत होती.. अंगाखांद्यावर ते जुनंच ओझं तोलत होती.. गिऱ्हाईकांशी बोलत होती.. तिच्या जवळच्या वस्तू विकत होती.. पण सगळं कसं यंत्रवत. तिचा आत्माच जणू तिला सोडून गेला होता. तिच ते स्वर्गीय हास्य विलग होणाऱ्या ओठांमधून तेव्हासारखं ओसंडत नव्हतं.**

आता ती इतर विक्रेत्यांसारखीच दिसायला लागली होती. बऱ्याचदा ती जवळून गेली की घामट पारोसा की कसला कोणजाणे वास यायचा.. त्या नंतर ती नेहमीच पुढे किंवा मागे वाकलेल्या अवस्थेत दिसू लागली.. आणि तसं तशीच जुनाट, निब्बर.. कर्कश वाटू लागली.. आता मी तिच्या कडून पूर्वी पेक्षा जास्त वस्तू खरेदी करू लागले.. कधी कधी अगदी जरूर नसतानाही टिकलीच एखादं पाकीट , एखादी पिन मी घेऊन टाकायचे.. तेवढाच तिला हातभार..! पण त्या नंतर तिच ते स्वर्गीय हसू परत कधी दिसलं नाही ते नाहीच. हे काही तिच्या एकटीचं नाही तिच्या सारख्या सगळ्याच कोवळ्या विक्रेत्याच बऱ्याचदा हे असच होत जात.. नाही..?

इतक्या हसऱ्या इतक्या नीटनेटक्या मुलीच हे असं कसं होऊन जातं.. ? हातावरच पोट, वारंवार येणारं बाळंतपण, दारिद्र्य ही कारणं माहीत असल्या मुळे.. मग उगाच.. मनात येतं की ती एक दोन वर्ष त्या इतक्या सुरेख कशा काय दिसतात..? ही नक्की स्वप्नील दिवसांची मोहिनी की.. तारुण्याची जादू.. ? त्यांचं ते हास्य ती निरागसता टिकवण्यासाठी काहीच का करता येणार नाही..?

त्या दिवशी मी काही तरी कारणाने लवकर घरी चालले होते.. तेव्हा अशीच एक अर्ध्या-मुर्ध्या वयाची मुलगेली विक्रेती लोकलच्या दाराशी उदासपणे उभी असलेली दिसली.. थोड्याच वेळात तिच्या दोन्ही डोळ्यातून निःशब्दपणे गंगा-जमुना झरू लागल्या.. आणि समोरच उभ्या असलेल्या मला फक्त बघ्याच्या भूमिकेत राहवेना..!

मी काही करु शकत होते किंवा नाही.. ही पुढची गोष्ट पण त्या क्षणी मी निदान तिच्याशी बोलू शकत होते.. तिला तिच्या उदासीच, रडण्याच कारण विचारू शकत होते.. नाही ते तसं मी विचारावंच असं खूप तीव्रतेने वाटून गेलं.. आणि मी तिच्याशी बोलू लागले. तर तेव्हा तिच्या अनिश्चित जगण्याचा आणखीन एक भाग कळून आला. त्या दिवशी तिला टीसीनी पकडून तिचं हातावरचं पोट सांभाळणारं.. चार खोक्याचं दुकान जप्त केलं गेलं होत. तशी तर तिला या प्रकाराचीही सवय होती.. हप्ता देऊनही.. ही अशी वेळ यावी यातही काहीच नवीन नव्हतं.. तिला दुःख झालं होत ते वेगळ्याच गोष्टीचं.. तिनं विक्रीसाठी आणलेलं सामान तर गेलंच होतं... पण जोडीस जोड त्याच बरोबर दिवसभर राबून मिळवलेले याच



बॉक्सच्या मध्ये ठेवलेले पैसेही गेले होते.. ते तेवढेच पैसे गेले असते तरी ती अशी गळून गेली नसती.. आपण विना परवाना लोकलच्या डब्यामध्ये फिरतो हे तिला माहीत होतं , त्यामुळे हे असं कधीमधी होणारच हे तिनं मान्यही केलं होतं. पण त्या खोक्यात तिचे आदल्या दिवशी कमावलेले पैसेही तसेच होते.. त्याच्या जोरावर तिने आज नवीन माल ही उचलला होता.. आणि आता हात पूर्णपणे रिकामे झाले होते.. ती रडत होती ते आदल्या दिवशीच्या कमाईसाठी. तिला ती जायला नको होती.

बोलता बोलता ती हिशोब मांडत गेली. खोक्यातील सामान साधारण पाचशे रुपयांच.. आणि दोन्ही दिवसाची कमाई मिळून दोनशे रुपये.. असा सातशे एक रुपयांचा फटका तिला बसला होता. तिचे अश्रू मला बघवत नव्हते.. आणि तिच दुःख मी दूरही करू शकत नव्हते.. ( मलाही माझे खर्च आणि हिशोब होतेच की. ) सहज वाटलं म्हणून सातशे रुपये काढून तिच्या हातावर ठेवावेत.. एवढी मी दानशूरही नाही. हो, पण मी माझ्या कडून तिला पन्नास एक रुपयांची मदत नक्की करू शकत होते.. मी तसे ते पर्स मधून काढलेही..

**तो पर्यंत तिच्या डोळ्यातले अश्रू ओसरले होते..**

**त्या जागी तेच प्रसन्न हास्य फुलवत तिनं मी देऊ केलेली नोट नाकारली..**



phadnissvp@gmail.com

# लोकल गोष्टी

एका उदास क्षणी मला भावणाऱ्या सुमुखीं पैकी एकीला मी काही काळ शब्दांची साथ देऊ केली. याच समाधान माझ्या आणि तिच्या चेहऱ्यावरच त्या क्षणा पुरतं का होईना..! निरामय आनंदाची आभा पसरून गेलं.

==============================================

**स्वाती फडणीस**



# लोकल गोष्टी

प्रवास म्हटलं की त्यात थांबे येणार हे आलंच कोणी चढणार कोणी तरी उतरणार ..
प्रवास मात्र कायम चालूच राहणार तसंच या लोकल गोष्टींचं तूर्तास हा एक थांबा,
प्रवासाचं प्रवाहीपण जपणारा, शब्दांचा.. संवादाचा ओघ सुरू ठेवणारा!..



स्टेशन मॅप



## सौ. स्वाती फडणीस

B.F.A. (Applied Arts)
सर जे. जे. इन्स्टिट्यूट ऑफ अप्लाईड आर्ट येथून पूर्ण केले.
तसेच एक्झिबिशन डिस्प्ले या विषयात स्पेशलायझेशन झाले आहे.

गेली दहा वर्ष अनुक्रमे एक्झिबिशन डिझायनर, व्हिजुअलायझर, व वेब डिझायनर म्हणून या क्षेत्रात कार्यरत आहे. त्याचबरोबर वारली पेंटिंग, स्टेन ग्लास पेंटिंग, ऑइल पेंटिंग, पॉट डेकोरेशन, मेहंदी डिझाइन, फोटोग्राफी, वाचन असे काही छंद मी नियमित जोपासत आहे..

या शिवाय माझे मराठी कथा कवितांचे लेखन चालूच असते. ऑर्कुट वर आल्यापासून त्यात खूप वाढ झाली.. येथूनच माझी "**चिमण गोष्टी"** ही कविता सॅन फ्रान्सिस्कोला झालेल्या विश्वमराठी संमेलनातीत वेब विभागात वाचनासाठी पाठवली गेली. " **निळे बोल** "या कवितेच ध्वनी मुद्रण झालं.. लोकल गोष्टींना पहिला वाचक वर्ग मिळाला. लोकल गोष्टींमधली **"हातातला खजिना**" ही गोष्ट लोकसत्ताच्या चतुरंग पुरवणीत छापून आली.इ बुक च्या माध्यमातून मी व माझ्या “**लोकल गोष्टी**” तुम्हाला भेटत राहतीलच तरी त्यांचे एकत्रित संग्रहण माझ्या ब्लॉगवर http://lokalgoshati.blogspot.com वाचनासाठी उपलब्ध आहे. माझ्या कवितां तुम्ही या http://shabdaanchyaadeshaat.blogspot.com ब्लॉगवर वाचू शकता..

**संपर्क: 9867375971**
**E mail: phadnissvp@gmail.com**

## ई साहित्य प्रतिष्ठान

हे नेटचं युग आहे. पैसे काढायला लोक आता ATM वापरतात. परिक्षांचे निकाल इंटरनेटवर बघतात. Admissions सुद्धा आता Online असतात. नोकरी साठी अर्जापासून ते नियुक्तीपर्यंत सारं मेल वर होतं. घरांच्या विक्रीपासून ते लग्नापर्यंत सारं काही इंटरनेटवर होतंय. मग साहित्य कसं काय मागे राहील? जगात आता लाखो ई बुक्स तयार होत आहेत. Blog वर उत्तमोत्तम साहित्य निर्मिती होते आहे. अनेक वेबसाईट्सवर अत्यंत दर्जेदार लिखाण उपलब्ध होतं आहे. मराठी जरी इंग्रजीच्या मानाने खुपच मागे असली तरी या माय मराठीतही अनेक संस्था आणि व्यक्ती इंटरनेटवर साहित्य निर्मितीचा पाठपुरावा अथक उत्साहाने करीत आहेत. ई साहित्य प्रतिष्ठान देखिल अशीच एक संस्था. विविध विषयांवरची ईबुक्स , नेटाक्षरी, स्वरनेटाक्षरी, ई स्टाप, बालनेटाक्षरी आदी प्रकाशनांची शंभरी ई साहित्य प्रतिष्ठानने गाठली आहे. ही शंभर ई प्रकाशने जगभरात पसरलेल्या सुमारे एक लाख मराठी वाचकांपर्यंत पोचवली गेली आहेत. कासवाच्या गतीने का होईना पण मराठी भाषा इंग्रजीच्या स्पर्धेत आहे. आणि रहाणार आहे. नक्की रहाणार आहे. कारण मराठीला अमृताशी पैजा घेण्याचा जितका अनुभव आहे तितकाच सम्राटांशी झुंजा घेण्याचा आहे.

**यावेळी आम्ही सादर करत आहोत इंटरनेटवर स्फुट, कथा आणि काव्यलेखन करणार्या स्वाती फ़डणीस यांच्या लोकल गोष्टी. त्या स्वतः चित्रकारही आहेत. रोजच्या लोकल प्रवासात त्यांचं संवेदनशील मन आजुबाजूच्या जगाची संगती लावत असतं आणि सर्जनशील वृत्ती त्यातून लिखाणाला जन्म देत असते. त्यातून एक सौंदर्यपूर्ण आविष्कार जन्माला आला आहे. त्यांचं लिखाण कधी लोकसत्ता तर कधी त्यांच्या blog वरून वाचनात आलं. त्यावर पुस्तक काढावं असा विचार आला. त्यांनीही त्याला दुजोरा दिला आणि हे पुस्तक जन्माला आलं. या ई पुस्तकात त्यांच्या चार स्फुटांचा समावेश आहे. हळू हळू इतरही स्फुटं प्रकाशित करूच. त्यांचे इतर लिखाण वाचण्यासाठी आपण त्यांच्या Blog http://lokalgoshati.blogspot.com ला भेट देऊ शकता.**

या पुस्तकावरील अभिप्रायासाठी आणि इतर प्रकाशने मिळवण्यासाठी लिहा

**esahity@gmail.com** **Ph: 9869674820**

## आजवरची प्रकाशित ई पुस्तकं :

- टल्लीची शाळा : टल्ली
- मकरंदची त्रिवेणी : कवी मकरंद सावंत
- ग्रेव्हयार्ड लिटरेचर : कवी प्राजक्त देशमुख
- तो आणि ती : कवी मयुरेश कुलकर्णी
- प्रियेचे अभंग : कवी रमेश ठोंबरे
- चार क्षण : संतोष नार्वेकर
- देशी दारूचे दुकान : लेखक धुंद रवी
- ई शाळा : मराठी कसे लिहावे : भारती सरमळकर
- तो , मी आणि सिगरेट : कवयित्री स्वप्ना कोल्हे
- मोरया : संकलन : वैशाली कुलकर्णी, अमृता ढगे

आगामी ई पुस्तके:

- मीराबाई : अनुवाद : प्राजक्त देशमुख
- अस्मिता : कमलेश पाटील
- सईची वही : काही पानं निखळलेली : सुप्रिया जाधव
- ग्रेव्हयार्ड लिटरेचर : भाग २ : प्राजक्त देशमुख
- मला माहित नाही : मयुरेश कुलकर्णी
- साता मिंटांची कहाणी : नाम गुम जायेगा
- ओथंब : मंजिरी दाभोळकर

## ई नियतकालिके

- नेटाक्षरी : ७७ अंक
- स्वरनेटाक्षरी : ८ अंक
- बालनेटाक्षरी : २ अंक
- ईस्टाप : ६ अंक

**संपर्क : esahity@gmail.com** **Ph. 9869674820**




## जीवनगाडी

====================

जीवन गाडी पटरी पे,
झूक-झूक, झूक-झूक ..
करती जाए, करती जाए ।
चलती जाए, चलती जाए ।

हो कैसा भी मोड..
शान सें मुडे..!
चाहे जितनी लंबी हो दौड..
जी जान सें दौडे ..! चलती जाए, चलती जाए ।

धून न्यारीसी बजाए,
गीत प्यारासा गाए..
सारे सुरों को समाए,
झूक-झूक, झूक-झूक.. करती जाए, करती जाए ।

चलती जाए, चलती जाए ।
जीवन गाडी पटरी पे,
झूक-झूक, झूक-झूक ..
करती जाए, करती जाए ।

=====================

**स्वाती फडणीस**

